**संसदीय कार्य विभागातील बाह्य यंत्रणेद्वारे सेवा उपलब्ध करण्यात आलेल्या पाच कर्मचाऱ्यांना (तीन लिपिक-टंकलेखक आणि दोन शिपाई) हिवाळी अधिवेशनासाठी नागपूर येथे उपस्थित राहिल्याबद्दल प्रवास भत्ता आणि दैनिक भत्ता "एक विशेष बाब" म्हणून मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**संसदीय कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०१६/प्र.क्र. १६९/पाच,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३० डिसेंबर, २०१६.

वाचा :- १) शासन परिपत्रक वित्त विभाग, क्रमांक पदनि २०१३/प्र.क्र.११/१३/विसु-१, दिनांक २ फेब्रुवारी, २०१३.
२) शासन निर्णय वित्त विभाग, क्रमांक संकीर्ण २०१४/प्र.क्र.५४७/सेवा-५, दिनांक ४ एप्रिल, २०१५.
३) शासन निर्णय, संसदीय कार्य विभाग क्रमांक २०१५/प्र. क्र.४८/पाच, दिनांक २३ मार्च २०१६.

प्रस्तावना :-

संसदीय कार्य विभागामध्ये रिक्त असलेल्या लिपिक-टंकलेखक आणि शिपाई या संवर्गातील अनुक्रमे तीन आणि दोन पदांचे काम बाह्य यंत्रणेकडून करुन घेण्यासाठी उपरोक्त संदर्भाधिन अनुक्रमांक १ येथील परिपत्रकामधील तरतुदीनुसार, वित्त विभागाच्या मान्यतेने, विहीत पद्धतीचा अवलंब करुन, मेसर्स क्रिष्णा मोटर्स, गोरेगांव, मुंबई या संस्थेमार्फत एकूण पाच व्यक्तींच्या सेवा उपलब्ध करुन घेण्यात आल्या आहेत.

२. संसदीय कार्य विभागामार्फत महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय आणि मंत्रालयीन प्रशासकीय विभाग यामध्ये अधिवेशनाशी संबंधित कामांच्या समन्वयाचे अत्यंत संवेदनशील असे कामकाज हाताळण्यात येते. त्यामुळे, प्रतिवर्षी नागपूर येथे होणाऱ्या महाराष्ट्र विधानमंडळाच्या हिवाळी अधिवेशनासाठी संसदीय कार्य विभागातील सर्व अधिकारी व कर्मचारी वर्ग संपूर्ण अधिवेशन कालावधीत नागपूर येथे उपस्थित राहतो. विभागातील रिक्त पदांचा विचार करता, बाह्य यंत्रणेद्वारे लिपिक-टंकलेखक आणि शिपाई पदांची कामे करुन घेण्यासाठी उपलब्ध झालेल्या व्यक्तींना या विभागाच्या नागपूर येथील शिबीर कार्यालयातील कामकाजासाठी नेण्याचा निर्णय घेण्यात आला; परंतु उक्त संदर्भाधिन अनुक्रमांक २ येथील शासन निर्णयामधील तरतुदीनुसार शासकीय अधिकारी / कर्मचाऱ्यांना अनुज्ञेय असलेला दैनिक भत्ता उक्त बाह्य यंत्रणेकडून भरण्यात आलेल्या व्यक्तींना अनुज्ञेय नाही. तरीही, या व्यक्तींना थोडेफार आर्थिक सहाय्य व्हावे, म्हणून नागपूर येथील अधिवेशन कालावधीतील त्यांच्या उपस्थितीसाठी त्यांना प्रवास भत्ता आणि दैनिक भत्त्यापोटी एक ठोक रक्कम, "एक विशेष बाब" म्हणून मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

पूर्वपृष्ठावरील प्रस्तावनेमध्ये नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेऊन, या विभागातील लिपिक-टंकलेखक आणि शिपाई या संवर्गातील अनुक्रमे तीन आणि दोन पदांची कामे बाह्ययंत्रणेकडून करुन घेण्यासाठी विहीत पद्धतीचा अवलंब करुन, बाह्य यंत्रणेद्वारे पाच व्यक्तींच्या सेवा उपलब्ध करुन घेण्यात आल्या आहेत. सदर पदांवर काम करणाऱ्या पाचही व्यक्ती विधानमंडळाच्या सन २०१६ च्या हिवाळी अधिवेशनासाठी दिनांक ४ डिसेंबर २०१६ ते दिनांक १७ डिसेंबर, २०१६ या कालावधीत त्यांना या विभागाच्या नागपूर येथील शिबीर कार्यालयांत उपस्थित होत्या. त्यांना लिपिक-टंकलेखक पदावरील तीन व्यक्तींसाठी प्रत्येकी रूपये २५०/- प्रतिदिन प्रमाणे दैनिक भत्ता १६ दिवसांसाठी रु. १२,०००/- आणि प्रवासभत्ता प्रत्येकी रूपये १०००/- प्रमाणे रूपये ३,०००/- असे एकूण रू. १५,०००/- (अक्षरी रूपये पंधरा हजार फक्त) आणि शिपाई पदावरील दोन व्यक्तींसाठी प्रत्येकी रूपये २००/- प्रतिदिन प्रमाणे दैनिक भत्ता १६ दिवसांसाठी रु. ६,४००/- आणि प्रवासभत्ता प्रत्येकी रूपये १,०००/- प्रमाणे रूपये २,०००/- असे एकूण रु. ८४००/- (अक्षरी रूपये आठ हजार चारशे फक्त) अशा प्रकारे एकूण पाच व्यक्तींसाठी त्यांच्या दैनिक भत्ता व प्रवासखर्चाप्रित्यर्थ एकूण रूपये २३,४००/- (अक्षरी रूपये तेवीस हजार चारशे फक्त) एवढी ठोक रक्कम **<u>“एक विशेष बाब”</u>** म्हणून वित्त विभागाच्या सहमतीने अदा करण्यास याद्वारे शासन मंजूरी देत आहे.

२. उक्त रक्कम ही उपरोक्त नमूद कर्मचाऱ्यांना नागपूर येथील हिवाळी अधिवेशनासाठी उपस्थित राहिल्यामुळे, थोडेफार आर्थिक सहाय्य व्हावे, या उद्देशाने, तसेच, त्यांना मंजूर केलेली रक्कम ही शासकीय कर्मचाऱ्यांना अनुज्ञेय असलेल्या दैनिक भत्त्याच्या दरापेक्षा अधिक नाही, हे विचारात घेऊन विशेष बाब म्हणून मंजूर करण्यात येत आहे.

३. सदर खर्च या विभागाच्या “मागणी क्रमांक पी-१, प्रधान लेखाशीर्ष-२०५२ सेकेटरीएट सर्वसाधारण सेवा ०९० सचिवालय,

(००)(०१) संसदीय कार्य विभाग (संकेतांक २०५२०२६८)

१३, कार्यालयीन खर्च.”

या लेखाशिर्षांतर्गत सन २०१६-१७ साठी उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा :-

४. उपरोक्त रक्कम ही मेसर्स क्रिष्णा मोटर्स यांच्यामार्फत द्यावयाची असल्याने, उक्त रक्कम एन. ई. एफ. टी. द्वारे “मेसर्स क्रिष्णा मोटर्स” यांच्या नांवे हस्तांतरित करण्यात यावी आणि सदरहू संपूर्ण रक्कम त्यांनी, त्यांच्यामार्फत उक्त संबंधित पाच व्यक्तींना प्रदान करावी आणि सदर प्रदानाच्या पावत्या संसदीय कार्य विभागास सादर कराव्या. प्रस्तुत अटीचे मेसर्स क्रिष्णा मोटर्स यांनी परिपूर्णपणे पालन करावे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ७७७/१६/व्यय-४, दिनांक २ डिसेंबर, २०१६ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१०३१५२८०७५५१५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Vasudeo Jadhav

Digitally signed by Sanjay Vasudeo Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Vasudeo Jadhav
Date: 2017.01.03 15:31:56 +05'30'

**( सं. वा. जाधव )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
२) प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा परीक्षा), मुंबई.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, वांद्रे - कुर्ला संकुल, मुंबई.
५) रोखशाखा, संसदीय कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ (२ प्रती)
६) मेसर्स क्रिष्णा मोटर्स, गोरेगांव, मुंबई. (६ प्रती) (संबंधित व्यक्तींना देण्यास्तव तसेच त्यांनी प्रस्तुत शासन निर्णयातील अटींचे तंतोतंत पालन करण्याच्या विनंतीसह.)
७) संबंधित व्यक्तींच्या विभागातील वैयक्तिक नस्तीसाठी.
८) निवडनस्ती.